**R.A.A. Flood Protection work to Smarak of late Yashwantrao Chavan & other regional places near confluence of krishna & koyna rivers at Karad, Dist.Satara**

**कृष्णा नदीच्या कृष्णा-कोयना प्रीती संगमावरील सातारा जिल्ह्यातील कराड येथील स्व.यशवंतराव चव्हाण समाधी स्थळाचे व अन्य धार्मिक स्थळांचे पुरापासून संरक्षण मिळण्यासाठी पूर संरक्षक योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र.पुसंयो-सुप्रमा २०११/(२८९/२०११)/सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १३/०७/२०११**

**पहावे :** १) शासन निर्णय : पुसंयो ९०५/(४२०/२००५)/सिंव्य(कामे), दि.१७.०३.२००७
२) कार्यकारी संचालक, कृखोपाविम, पुणे यांचे पत्र जा.क्र.मकृखोविम/५८१०/(८५०/२०१०)/मप्र-३/सिं-१/पूसं/४४/२१३६/सन २०११, दि.१९ मार्च, २०११
३) कार्यकारी संचालक, मकृखोविम, पुणे यांचे पत्र जा.क्र.मकृखोविम/५८१०/(८५०/२०१०)/मप्र-३/सिं-१/पूसं/४४/२७९१/सन २०११, दि.९ एप्रिल, २०११
४) मुख्य अभियंता, जसंवि, पुणे यांचे पत्र जा.क्र.मुअ/काअ-२/उअ ४/प्रशा ७/२०४९, दि.८ एप्रिल, २०११

**प्रस्तावना :**

सातारा जिल्ह्यातील कऱ्हाड येथील कृष्णा-कोयना प्रीती संगमावरील स्व.यशवंतराव चव्हाण समाधी स्थळांचे व अन्य धार्मिक स्थळाचे पुरापासून संरक्षण होण्यासाठी पुर संरक्षण योजनेस शासनाने संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रु.१४६४.९५ लक्ष रकमेसप्रशासकीय मान्यता दिली होती. तद्नंतर तत्कालीन केंद्रीय राज्यमंत्री श्री.पृथ्वीराज चव्हाण यांनी मा.मुख्यमंत्री महोदयांना लिहिलेल्या टिप्पणीच्या अनुषंगाने पुरसंरक्षक कामाचा सुधारित प्रस्ताव सादर करण्याचे निदेश देण्यात आले होते. त्यानुसार कृष्णा नदीच्या उजव्या तीरावर सा.क्र.५०० मी. ते १७७० मी. पर्यंत व सा.क्र.११०० मी ते १२४५ मी पर्यंत संरक्षक भिंत वाढविणेचे कामाचा सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला.

नाला, रस्ता इत्यादी ठिकाणी वाहतुकीच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने पूर संरक्षक भिंत बांधण्यात आलेली नसल्याने उपाध्यक्ष, महाराष्ट्र कृष्णा खेरे विकास महामंडळ यांनी सदर काम कोयना पूल ते कृष्णा पूल या

दरम्यान ओढा आणि घाट रस्ता या ठिकाणी स्कायवॉक बांधावा अशा सूचना दिल्या होत्या. त्यानुसार कृष्णा नदीच्या कृष्णा-कोयना प्रीती संगमावरील सातारा जिल्ह्यातील स्व.यशवंतराव चव्हाण समाधी स्थळ व इतर धार्मिक स्थळांचे पुरापासून संरक्षण होण्यासाठी पुर संरक्षण योजनेच्या रु.३९६०.५८ लक्ष किंमतीच्या कामास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

या शासन निर्णयाद्वारे सातारा जिल्ह्यातील कऱ्हाड येथील कृष्णा नदीच्या कृष्णा-कोयना प्रीती संगमावरील स्व.यशवंतराव चव्हाण समाधी स्थळांचे व अन्य धार्मिक स्थळाचे पुरापासून संरक्षण होण्यासाठी पुर संरक्षण योजनेच्या कामास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता रु.३९६०.५८ लक्ष (रु.तीन हजार नऊशे साठ लक्ष अठ्ठावन्न हजार मात्र) (रु.३९११.३९ लक्ष कामाप्रित्यर्थ व रु.४९.१९ लक्ष अनुषंगिक खर्च) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटीच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१) शासन परिपत्रक क्र.एफडीडब्ल्यू १०९२/(१७०/९२)/सिंव्य(कामे) दि.७/८/१९९२ नुसार १० टक्के लोकवर्गणी प्रत्यक्ष जमा झाल्याशिवाय किंवा स्थानिक संस्था यांचे १० टक्के लोकवर्गणीचा खर्च सोसावयास तयार असल्याबाबतचे प्रमाणपत्र प्रत्यक्ष प्राप्त झाल्याशिवाय वाढीव कामास सुरुवात करु नये.

२) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर नगरपरिषद, कऱ्हाड यांनी ताब्यात घेऊन या योजनेची देखभाल दुरुस्ती करावयाची आहे.

३) योजनेची उर्वरित कामे नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत पूर्ण करण्यात यावी.

या कामावर होणारा खर्च ४७११- पूर नियंत्रण कामे यावरील भांडवली खर्च (०१) पूरनियंत्रण, (१०३) नागरी कामे, १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुंका, (०१)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७११ ०२०९) या लेखाशीर्षाखाली खर्च करावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.......... सन २०११-१२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३१/१४३४, दि.३१.५.२०११ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५९/व्यय१२, दि.२७.६.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर(www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०७१३१६२१५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत : परिशिष्ट

**( पां. तु. केदारे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहायक, मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, प्रधान सचिव, नियोजन विभाग, (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (व्यय), वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे,
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे,
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली,
अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्र.पुसंयो-सुप्रमा २०११/(२८९/२०११)/सिंव्य(कामे), दिनांक १३/०७/२०११ चे प्रपत्र**

## परिशीष्ट

| अ.क्र. | शीर्ष/उपशीर्ष | अंदाजित किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| | ए-प्राथमिक | १.६८ |
| | सी-कामे | ३८७१.०० |
| | पी-देखभाल | ३८.७१ |
| | **एकूण (कामाप्रित्यर्थ)** | **३९११.३९** |
| | अनुषंगिक खर्च | ४९.१९ |
| | **एकूण रक्कम** | **३९६०.५८** |